**सामाजिक न्याय विभागांतर्गत कार्यरत असलेल्या अपंगांच्या शासकीय विशेष शाळेतील शिक्षकांना चटोपाध्याय आयोगाच्या शिफारशीप्रमाणे त्रिस्तरीय वेतनश्रेणी लागू करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- सकआ-२०१३/प्र.क्र.३६९/आस्था-२,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १० जुलै, २०१७

<u>**संदर्भ :-**</u> १) शासन निर्णय, सामाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व पर्यटन विभाग, क्र.एसआरव्ही -१०८९/४८६७७/के.नं.६६५/सुधार-२, दि.५.६.१९९२
२) मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, औरंगाबाद यांचे दि.३.५.२०१० व दि.२६.६.२०१३ चे आदेश.
३) मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ, औरंगाबाद यांचे दि.८.६.२०११ व दि.७.२.२०१७ चे आदेश.
४) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.सकआ-२००९/ (२६१/२००९)/ आस्था-२, दि.२६.४.२०१२.

<u>**प्रस्तावना :-**</u>

सामाजिक न्याय विभागांतर्गत कार्यरत असलेल्या अपंगांच्या अनुदानित विशेष शाळेतील शिक्षक कर्मचाऱ्यांना प्रा.बी.पी. चटोपाध्याय यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या शिक्षकांसाठी राष्ट्रीय आयोगाने केलेल्या शिफारशींनुसार शिक्षकांना त्रिस्तरीय वेतनश्रेणी लागू करण्यात आलेल्या आहेत. त्या प्रमाणेच या विभागांतर्गत कार्यरत असलेल्या अपंगांच्या शासकीय विशेष शाळांमधील शिक्षकांना सदरची वेतनश्रेणी लागू करण्याबाबत श्री.परशुराम लक्ष्मण करंदीकर व इतर यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ औरंगाबाद यांचेकडे मूळ अर्ज क्रमांक ११२८/१९९९ अन्वये याचिका दाखल केली होती. या याचिकेमध्ये मा.न्यायाधिकरणाने सदर शिक्षक कर्मचाऱ्यांना प्रा. बी.पी. चटोपाध्याय यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या शिक्षकांसाठी राष्ट्रीय आयोगाने केलेल्या शिफारशीनुसार त्रिस्तरीय वेतनश्रेणी लागू करण्याबाबत दिनांक ३.५.२०१० रोजी अंतिम आदेश पारित केलेले आहेत. सदर आदेशाची शासनस्तरावरुन अंमलबजावणी न झाल्याने सदर याचिकाकर्त्यांपैकी श्री. रेवनाथ रंगनाथराव लांडगे व इतर या शिक्षक कर्मचाऱ्यांनी मा.न्यायाधिकरणाकडे पुनश्च अवमान याचिका दाखल करुन त्यामध्ये मा.न्यायाधिकरणाने दि.२६.६.२०१३ रोजी आदेश पारित करुन याचिकाकर्ता यांच्या म्हणण्यानुसार सदरची त्रिस्तरीय वेतनश्रेणी लागू करण्याबाबत आवश्यक शासन निर्णय निर्गमित करावा, असे निर्देश दिलेले आहेत.

२. दरम्यानच्या कालावधीत सदर कर्मचाऱ्यांपैकी श्रीमती कुसूम शंकर बनसोडे व इतर यांनी मा.उच्च न्यायालय खंडपीठ, औरंगाबाद येथे त्रिस्तरिय वेतनश्रेणीची मागणी न करता पाचव्या वेतन आयोगाच्या वेळी देण्यात आलेल्या रु.४०००-६००० या वेतनश्रेणी ऐवजी त्यांच्या प्रमाणेच कर्तव्ये व जबाबदाऱ्या असणाऱ्या खाजगी अपंग संस्थेतील विशेष शिक्षकांना देय असलेली रु.४५००-७०००

अशी वेतनश्रेणी लागु करण्याकरिता रिट पिटीशन क्र.८०१९/२००९ दाखल केली होती. त्यावर मा.उच्च न्यायालयाने दि.८.६.२०११ रोजी अर्जदारांच्या बाजुने निर्णय देऊन सदर शिक्षकांना पाचव्या वेतन आयोगाप्रमाणे वेतनश्रेणी देण्याचे व सहा महिन्यांच्या आत वेतन थकबाकी देण्याचे आदेश दिले होते. मा.उच्च न्यायालयाच्या या निर्णयाविरुध्द अपिल करणे उचित होणार नसल्याचे अभिप्राय सरकारी अभियोक्ता, उच्च न्यायालय, औरंगाबाद यांनी दिल्याने मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशाची अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने शासन आदेश दि.२६.४.२०१२ अन्वये शासकीय अपंग संस्थेतील विशेष शिक्षकांना अनुदानित अपंग संस्थेतील विशेष शिक्षकांप्रमाणे रु.४५००-७००० अशी वेतनश्रेणी वित्त विभागाच्या मान्यतेने मंजुर करण्यात आलेली आहे.

३. तद्नंतर मा.न्यायाधिकरणाने दि.२६.६.२०१३ रोजी सदर शिक्षकांना त्रिस्तरीय वेतनश्रेणी लागू करण्याबाबत आदेश दिल्याने मा.उच्च न्यायालय व मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण यांच्या आदेशांमधील विरोधाभास निर्माण झाला होता. सबब मा.उच्च न्यायालयात रिट याचिका क्र.५९८८/२०१४ दाखल करून मा.उच्च न्यायालय व मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण यांच्या आदेशांमधील विरोधाभास मा.न्यायालयाच्या निदर्शनात आला. मा.न्यायालयाने प्रस्तुत रिट याचिका क्र.५९८८/२०१४ प्रकरणी दि.७.२.२०१७ रोजी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या आदेशानुसार सदर शिक्षकांना प्रा.चट्टोपाध्याय समितीच्या शिफारशीप्रमाणे त्रिस्तरिय वेतनश्रेणी लागु करण्याचे आदेश दिलेले आहेत.

४. आता मा.उच्च न्यायालय व मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण यांच्या आदेशांनुसार अपंगांच्या शासकीय संस्थांतील शिक्षक कर्मचाऱ्यांना प्रा.बी. पी. चटोपाध्याय यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या शिक्षकांसाठी राष्ट्रीय आयोगाने केलेल्या शिफारशीनुसार मूळ वेतनश्रेणी, वरिष्ठ वेतनश्रेणी व निवडश्रेणी अशी त्रिस्तरीय वेतनश्रेणी लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, औरंगाबाद यांनी दिनांक २६ जून, २०१३ रोजी व मा.उच्च न्यायालयाच्या दि.७.२.२०१७ च्या आदेशांनुसार अपंगांच्या शासकीय विशेष शाळेतील शिक्षकांना विवरणपत्र “अ” मध्ये दर्शविल्याप्रमाणे त्रिस्तरीय वेतनश्रेणी खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून दिनांक १ जानेवारी, १९८६ पासून मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर शिक्षकांना सदर वेतनश्रेणी लागु करण्यापुर्वी त्यांना यापुर्वी लागू करण्यात आलेल्या पाचव्या वेतन आयोगाप्रमाणे दिलेली वेतनश्रेणी व इतर अनुषंगिक लाभ वसूल / समायोजीत करण्यात यावेत.

२. सुधारीत त्रिस्तरीय वेतनश्रेणीमध्ये वेतन निश्चिती करण्याकरीताचे नियम यासोबतच्या परिशिष्टाप्रमाणे राहतील.

३. आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य यांनी वरीलप्रमाणे त्रिस्तरीय वेतनश्रेण्या लागू करताना संबंधित कर्मचारी त्या पदासाठी पात्र आहे किंवा नाही याची खात्री करुन संबंधित शिक्षक कर्मचाऱ्यांच्या वेतनश्रेणीस मान्यता द्यावी.

४. या बाबीवर होणारा खर्च संबंधित शिक्षकांचे वेतन ज्या लेखाशिर्षामधून करण्यात येते त्या लेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १९१/२०१७ दि.५.७.२०१७ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

६. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७१०१६४३१९२०२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dnyandev Laxman Sul

Digitally signed by Dnyandev Laxman Sul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=a19e16d10b98348341561863c7561e9fc35bb428cdc3ea443c0263495f76285a, serialNumber=0a540933faf44a550ca357b423fa83e6fdce81a4746d167dae68daa29726d41d, cn=Dnyandev Laxman Sul
Date: 2017.07.10 16:43:57 +05'30'

(ज्ञा. ल. सुळ)
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
३. सर्व प्रादेशिक उपायुक्त समाजकल्याण
४. सर्व मुख्य वित्त व लेखाधिकारी, जिल्हा परिषद.
५. सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद.
६. सहायक आयुक्त समाजकल्याण, मुंबई शहर / उपनगर.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१०.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
११.मा. मंत्री / राज्यमंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२. सचिव (सामाजिक न्याय) यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१३.वित्त विभाग/सेवा-९, मंत्रालय, मुंबई.
१४.सहसचिव (आस्था-२/ अपंग कल्याण) यांचे स्वीय सहाय्यक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१५.आस्था-२/संग्रहार्थ.

## परिशिष्ट

अपंगांच्या शासकीय संस्थेतील शिक्षकांना द्विस्तरीय / त्रिस्तरीय वेतनश्रेण्या लागू करण्याबाबतचे नियम.

अपंगांसाठी चालविण्यात येणाऱ्या सामाजिक न्याय विभागांतर्गत शासकीय विशेष शाळांमधील शिक्षकांना दिनांक १ जानेवारी, १९८६ पासून चटोपाध्याय आयोगाच्या शिफारशीप्रमाणे त्रिस्तरीय वेतन रचना मंजूर करण्याच्या निर्णयानुसार विशेष शिक्षक प्रशिक्षित व शिक्षक (हस्तव्यवसाय / कला / शारिरीक शिक्षण / गायन / चलन वलन अवयव प्रशिक्षक) यांची मूळ वेतनश्रेणी, वरिष्ठ वेतनश्रेणी व निवड वेतनश्रेणी शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्राप्रमाणे राहील.

अ) वरिष्ठ श्रेणीस पात्र होण्यासाठी उमेदवाराला खालील अटींची पूर्तता करणे आवश्यक राहील.

१) प्रशिक्षण अर्हतेसह १२ वर्षाची अर्हताकारी सेवा.

२) या कामासाठी नियुक्त केलेल्या समितीला उमेदवाराचे कामकाज समाधानकारक वाटणे.

३) चौथ्या वेतन आयोगाप्रमाणे दक्षतारोध असल्यास दक्षतारोध पार करणे आवश्यक राहील.

४) आर.सी.आय. नियम लागू झाल्यानंतरच्या तारखेस ही वेतनश्रेणी देय असणाऱ्या विशेष शिक्षकांनी आर.सी.आय.च्या नियमाप्रमाणे आर.सी.आय.ची नोंद करणे, प्रमाणपत्र घेणे, त्याचे नुतनीकरण करणे आणि सी.आर.इ. प्रशिक्षण पूर्ण करणे आवश्यक आहे.

ब) निवडश्रेणीस पात्र होण्यासाठी उमेदवाराला खालील अटींची पूर्तता करणे आवश्यक राहील.

१) त्याने किंवा तिने वरिष्ठ श्रेणीत १२ वर्षाची अर्हताकारी सेवा पूर्ण केली असली पाहिजे.

२) शासन विहित करेल असे, सेवांतर्गत प्रशिक्षण त्यांनी किंवा तिने पूर्ण केले असले पाहिजे.

३) विशेष शिक्षक प्रशिक्षित व शिक्षक (हस्तव्यवसाय / कला / शारिरीक शिक्षण / गायन / चलन वलन अवयव प्रशिक्षक) यांनी पदवीधराची अर्हता प्राप्त केली असली पाहिजे.

४) विशेष शिक्षक प्रशिक्षित व शिक्षक (हस्तव्यवसाय / कला / शारिरीक शिक्षण / गायन / चलन वलन अवयव प्रशिक्षक) यांनी १२ वर्षाची वरिष्ठश्रेणीमध्ये अर्हताकारी सेवा पूर्ण केल्यानंतर निवडश्रेणी साठीची शैक्षणिक अर्हता प्राप्त करण्याच्या अटीवर अनुज्ञेय आहे. याबाबत स्पष्ट करण्यात येते की, ज्या शिक्षकांनी वरिष्ठ वेतनश्रेणीमध्ये १८ वर्ष व त्यापेक्षा जास्त अर्हताकारी सेवा पूर्ण केली असेल अशा शिक्षकांना पुढील उच्चश्रेणी म्हणजेच निवडश्रेणीसाठी विहित केलेली शैक्षणिक अर्हता मिळविण्यापासून सूट मिळू शकेल. तथापि, ज्यांनी १८ वर्षे पूर्ण एवढी सेवा वरिष्ठश्रेणीमध्ये केली नसेल अशा शिक्षकांना त्यांनी विहित शैक्षणिक अर्हता प्राप्त केल्याशिवाय त्यांचा पुढील निवड वेतनश्रेणीसाठी विचार करता येणार नाही.

५) आर.सी.आय. नियम लागू झाल्यानंतरच्या तारखेस ही वेतनश्रेणी देय असणाऱ्या विशेष शिक्षकांनी आर.सी.आय. च्या नियमाप्रमाणे आर.सी.आय. ची नोंदणी करणे, प्रमाणपत्र घेणे, त्याचे नुतनीकरण करणे आणि सी.आर. इ. प्रशिक्षण पूर्ण करणे आवश्यक आहे.

क) १२ वर्षाच्या प्रशिक्षित अर्हतेसह झालेल्या सलग सेवेनंतर मूळ वेतनश्रेणीतून पुढील वरिष्ठ वेतनश्रेणीमध्ये / निवडश्रेणीमध्ये त्यांचे वेतन निश्चित करण्यात येईल अशावेळी त्या शिक्षकांच्या दर्जामध्ये (Status) व जबाबदाऱ्यांमध्ये फरक होत नसल्याने मूळ वेतनाएवढ्या रकमेचा वरिष्ठश्रेणीत टप्पा असेल तर वेतन त्या टप्प्यावर निश्चित करण्यात यावे व असा टप्पा नसेल तर वरिष्ठ / निवडश्रेणीतील नजिकच्या वरच्या टप्प्यावर वेतन निश्चिती करावी.

ड) ज्या शिक्षक कर्मचाऱ्यांना यापूर्वी कालबध्द पदोन्नती / आश्वासित प्रगती योजनेचा लाभ देण्यात आलेला असेल तर तो लाभ त्यांना या शासन निर्णयाप्रमाणे अनुज्ञेय होत नसल्यामुळे त्यांचे वेतन या वेतनश्रेणीप्रमाणे निश्चित करण्यात यावे. त्यांना कालबध्द / आश्वासिक प्रगती योजनेचा लाभ घेता येणार नाही.

## नियम शिथिल करण्याचा अधिकार

कोणत्याही विशिष्ट प्रकरणात या नियमाच्या सर्व किंवा कोणत्याही तरतूदी लागू केल्यामुळे अकारण शिक्षक कर्मचाऱ्यांना अडचण निर्माण होईल अशी शासनाची खात्री झाल्यास अशा कर्मचाऱ्याचे प्रकरण न्याय्य व रास्त पध्दतीने हाताळण्यासाठी शासनास आवश्यक वाटेल अशा मर्यादेच्या व शर्तीच्या अधीन राहून तो नियम लागू करणे किंवा त्या नियमानुसार आवश्यक म्हणून ठरविलेल्या बाबी शिथील करण्याचा आदेश शासन काढू शकेल.

## निराकरण

या नियमाच्या कोणत्याही तरतूदीच्या निराकरणासंबंधी कोणताही प्रश्न निर्माण झाल्यास तो महाराष्ट्र शासनाच्या सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडे निर्दिष्ट करण्यात येईल आणि त्या विभागाचा त्यावरील निर्णय अंतिम राहिल.

----------

विवरणपत्र “अ”

अपंगांच्या शासकीय विशेष शाळांतील शिक्षकांना चटोपाध्याय आयोगाप्रमाणे त्रिस्तरीय वेतनश्रेण्या

| अ. क्र. | पदनाम | चौथ्या वेतन आयोगाप्रमाणे वेतनश्रेणी ₹ | | पाचव्या वेतन आयोगाप्रमाणे वेतनश्रेणी ₹ | | सहाव्या वेतन आयोगाप्रमाणे वेतनश्रेणी ₹ | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | मान्य वेतनश्रेणी ₹ | चट्टोपाध्याय आयोगाप्रमाणे सुधारीत वेतनश्रेणी ₹ | मान्य वेतनश्रेणी ₹ | चट्टोपाध्याय आयोगाप्रमाणे सुधारीत वेतनश्रेणी ₹ | मान्य वेतनश्रेणी ₹ | चट्टोपाध्याय आयोगाप्रामाणे सुधारीत वेतनश्रेणी ₹ |
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. | ७. | ८. |
| १. | विशेष शिक्षक (प्रशिक्षित) | १२००-२०४० | १) मूळ श्रेणी १२००-२०४०<br>२) वरिष्ठ श्रेणी १४००-२६००<br>३) निवड श्रेणी १६४०-२९०० | ४५००-१२५-७००० | १) मूळ श्रेणी ४५००-१२५-७०००<br>२) वरिष्ठ श्रेणी ५५००-१७५--९०००<br>३) निवड श्रेणी ६५००-२००-१०५०० | ५२००-२०२०० ग्रेड वेतन २८०० | १) मूळ श्रेणी ५२००- २०२०० (ग्रे.वे. २८००)<br>२) वरिष्ठ श्रेणी ९३००-३४८०० (ग्रे.वे. ४३००)<br>३) निवड श्रेणी ९३००-३४८०० (ग्रे.वे. ४४००) |
| २. | शिक्षक (हस्तव्यवसाय/ कला/ शारिरीक शिक्षण/ गायन/ चलन वलन अवयव प्रशिक्षक) | १२००-२०४० | १) मूळ श्रेणी १२००-२०४०<br>२) वरिष्ठ श्रेणी १४००-२६००<br>३) निवड श्रेणी १६४०-२९०० | ४५००-१२५-७००० | १) मूळ श्रेणी ४५००-१२५-७०००<br>२) वरिष्ठ श्रेणी ५५००-१७५--९०००<br>३) निवड श्रेणी ६५००-२००-१०५०० | ५२००-२०२०० ग्रेड वेतन २८०० | १) मूळ श्रेणी ५२००- २०२०० (ग्रे.वे. २८००)<br>२) वरिष्ठ श्रेणी ९३००-३४८०० (ग्रे.वे. ४३००)<br>३) निवड श्रेणी ९३००-३४८०० (ग्रे.वे. ४४००) |